आदिवासी क्षेत्र उपयोजना/ आदिवासी क्षेत्राबाहेरील उपयोजना सन २०१५-१६ अंतर्गत लहान पाटबंधारे या योजनेस लेखाशिर्ष २७०२ ८७६९ खाली निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१५/प्र.क्र.२३/कार्यासन.६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: - १० नोव्हेंबर, २०१५.

वाचा -

१) वि. वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८२/अर्थ-३, दि.३०.३.२०१५.
२) वि. वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७.४.२०१५.
३) ग्रामविकास व जलसंधारण विभागाची नस्ती क्र.मजम- २०१५/ प्र.क्र.१५८/जल-३.

**शासन निर्णय-**

आदिवासी उपयोजनांतर्गत मागणी क्र.टी-५, २७०२- लहान पाटबंधारे, ८० सर्वसाधारण, ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (०६) स्थानिक क्षेत्रातील लघुपाटबंधा-यांची कामे (० ते १०० हेक्टर ) (राज्य स्तरीय योजना) ( २७०२ ८७६९ ),३१ सहायक अनुदाने ( वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ या वर्षात रु. ८००.०० लक्ष निधी अर्थसंकल्पित आहे.

नाशिक जिल्हयाच्या त्र्यंबकेश्वर तालुक्यातील ० ते १०० हेक्टर सिंचन क्षमतेचे साठवण तलाव कळमुस्ते ( जांभुळवाडी ) वेळे ( होलदार नगर )-२, शिवाजी नगर-१ व शिवाजीनगर-२ या योजनेचे काम जलसंधारण महामंडळाकडून प्रगतीपथावर असून आदिवासी लाभार्थी व त्यांचे लाभक्षेत्र जवळपास १०० % असल्याने लेखाशिर्ष २७०२ ८७६९, **३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ या वर्षात अर्थसंकल्पित रु. ८००.०० लक्ष निधीतून रु. १५८.२८ लक्ष (रुपये एक कोटी अठ्ठावण्ण लाख अठ्ठावीस हजार फक्त ) निधी** या योजनेचे नियंत्रक अधिकारी सचिव, जलसंधारण विभाग यांना खर्चासाठी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरित करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदरहू निधी खालीलप्रमाणे वितरीत करण्यात यावा.

( रुपये- लक्ष )

| अ.क्र. | योजनेचे नांव | | तालुका | जिल्हा | वितरीत निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | सा.त. | कळमुस्ते ( जांभुळवाडी ) | त्र्यंबक | नाशिक | १५.२८ |
| २ | सा.त. | वेळे ( होलदारनगर-२) | त्र्यंबक | नाशिक | ५९.०० |
| ३ | सा.त. | शिवाजीनगर-१,२ | त्र्यंबक | नाशिक | ८४.०० |
| | | **एकुण :-** | | | **१५८.२८** |

२. **उपरोक्त वितरीत केलेला निधी या प्रकल्पाच्या मंजूर प्रशासकीय मान्यता रकमेच्या मर्यादेत करण्याची तसेच त्यानुषंगाने निधी खर्च करण्यासंबंधीच्या नियमांचे पालन करण्याची दक्षता नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी.** नियंत्रण अधिकारी आणि विभागप्रमुख यांनी ही तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५ दिनांक ९.३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्र व क्षेत्राबाहेरील मान्य योजनांवर खर्च होतील याची दक्षता घ्यावी. तसेच या तरतूदी खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.१०१/का-६, दिनांक २६ जुलै, २००४ व टिएसपी-

२००५/प्र.क्र.५९/का-६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी. तसेच प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या तरतूदी मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी.

३. **आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लोकांकरिता वा आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी.** तसेच आदिवासी क्षेत्राबाहेरील क्षेत्रासाठी केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लोकांकरिता खर्च करण्यात यावी. आदिवासी उपयोजनेंतर्गत केलेली तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर किंवा सर्वसाधारण योजनेखाली खर्च करण्यात येवू नये.

४. तसेच आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल लेखाशिर्षनिहाय/उप लेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती सबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास, ग्रामविकास व जलसंधारण विभाग व आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल व तो केंद्र शासनाला कळविता येईल.

६. सदर शासनादेश **वाचा** येथील क्रमांक २ मधील वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७.४.२०१५. अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१११०१७१७३७८३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Manojkumar Gorakh Mahale

Digitally signed by Manojkumar Gorakh Mahale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SECTION OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=46649f0512aae1ea70b45531f8da4721c9c533d2067535914c930bf1b55d3262, cn=Manojkumar Gorakh Mahale
Date: 2015.11.10 17:18:39 +05'30'

**मनोजकुमार महाले**
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. सचिव, (जलसंधारण), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई

२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

३. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग.

४. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.

५. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

६. विभागीय आयुक्त, मुंबई / नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/ पुणे.

७. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.

८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

०९. वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१०. ग्रामविकास व जलसंधारण विभाग, जल-०३, मंत्रालय, मुंबई

११. कार्यासन अधिकारी, कार्यासन- २, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१२. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.